डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमित्त १२५ निवडक गांवांतील दलित वस्त्यांचा सर्वांगीण विकास करणे रेठरे धरण, ता. वाळवा, जि. सांगली.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: दवसु-२०१८/प्र.क्र.१९७ (भाग-७)/अजाक**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: ०१ नोव्हेंबर, २०१८.

**वाचा :**

१. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक: सान्यावि-२०१५/ प्र. क्र.१६३/ बांधकामे, दिनांक ०९ ऑक्टोबर,२०१५.
२. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक:दवसु-२०१६/प्र. क्र.१५६/ अजाक, दिनांक १२ ऑगस्ट,२०१६.
३. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक: बैठक-२०१८/प्र. क्र.२/ अजाक, दिनांक ०६ मार्च, २०१८.
४. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र, क्रमांक: सकआ / मावक /अजानबौघवि / निअजानबौ / डॉबाआं१२५जयंती / २०१८ / का-१२ / ५१५३, दिनांक १६ जुलै, २०१८.
५. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र. क्र.३००/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५.

**प्रस्तावना:**

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमित्त १२५ निवडक गांवांतील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या वस्त्यांचा सर्वांगिण विकास करण्याचा निर्णय शासनाने उपरोक्त वाचा २ अन्वये घेतलेला आहे. सदर निर्णयांतर्गत “रेठरे धरण, ता. वाळवा, जि. सांगली” येथील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या वस्तीचा समावेश उपरोक्त वाचा ३ अन्वये करण्यात आलेला आहे. यास अनुसरून रेठरे धरण, ता. वाळवा, जि.सांगली येथील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या वस्त्यांचा विकासाचा उप अभियंता, वाळवा पंचायत समिती, इस्लामपूर सार्वजनिक बांधकाम उप विभाग ( इ. व द.), यांनी तयार केलेला प्रस्ताव उपरोक्त वाचा ४ अन्वये आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनास पुढील कार्यवाहीस्तव सादर केलेला आहे. सदर प्रस्तावातील शासनाने मान्य केलेले आणि उपरोक्त वाचा ५ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांतर्गत येणा-या कामाचे प्रस्तावापैकी प्रस्तावातील अनुक्रमांक ११ खालीलप्रमाणे :

| अ.क्र. | प्रस्तावातील अनुक्रमांक | कामाचे नांव | अंदाजित रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १. | ११. | स्ट्रीट लाईट व हायमास्ट | १४,५३,४६० |
| | | **एकूण** | **१४,५३,४६०** |
| **अक्षरी रुपये चौदा लक्ष त्रैप्पन हजार चारशे साठ फक्त** | | | |

सदर कामाच्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमित्त १२५ निवडक गांवांतील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या वस्त्यांचा सर्वांगिण विकास करण्याच्या निर्णयास अनुसरुन आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी रेठरे धरण, ता. वाळवा, जि.सांगली येथील अनुसूचित जाती व नवबौध्द वस्ती विकासाच्या सादर केलेला उपरोक्त रुपये १४,५३,४६०/- (अक्षरी रुपये चौदा लक्ष त्रैप्पन हजार चारशे साठ फक्त) च्या प्रस्तावास पुढील अटी व शर्तीच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

अ. सदर प्रस्तावातील कामांचे बांधकाम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा, तसेच विस्तृत नकाशास शासनाने नियुक्त केलेल्या वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

ब. सदर प्रकरणी शासन निर्णय, दिनांक १२ ऑगस्ट, २०१६ मधील इतर अटी परिच्छेदातील अनुक्रमांक ६ नुसार सदर कामे सार्वजनिक बांधकाम विभाग/जिल्हा परिषद बांधकाम विभाग यांच्यामार्फत करण्यात यावीत.

क. निधी वितरणाच्या मार्गदर्शक सुचना समाजकल्याण आयुक्तस्तरावरुन देण्यात याव्यात.

ड. वित्तीय अधिकाराचा शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील अटींचे पालन करण्यात यावे.

२. सदर प्रस्तावावर होणारा खर्च हा मागणी क्रमांक एन-३, मुख्य लेखाशिर्ष २२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण, ०१-अनुसूचित जातीचे कल्याण, ७८९-अनुसूचित जाती घटक योजना,०२-भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची १२५ वी जयंती साजरी करणे (योजना-दत्तमत), लेखाशिर्ष-२२२५-डी-८२३ या लेखाशीर्षाखाली खर्ची घालून तो सन २०१८-१९ या वर्षात करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून भागविण्यात यावा. यासाठी आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय, वित्तीय अधिकाराचा शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उप विभाग पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ अन्वये विभाग प्रमुखास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीनुसार काढण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१११६१२३४११३१२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Dinesh Ramchandra Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, cn=Dinesh Ramchandra Dingle
Date: 2018.11.16 12:39:01 +05'30'

**( दि.रा.डिंगळे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, पुणे विभाग, पुणे.
३. कार्यकारी अभियंता (इ. व द.), जिल्हा परिषद, सांगली.
४. श्री. स.रा.पाटील, वास्तुशास्त्रज्ञ, उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे कार्यालय, पुणे.
५. उप अभियंता, वाळवा पंचायत समिती, इस्लामपूर सार्वजनिक बांधकाम उप विभाग (इ. व द.), जि. सांगली.
६. सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण, सांगली.
७. जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, सांगली.
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -१, महाराष्ट्र, मुंबई.
९. महालेखापाल (लेखापरिक्षा) -१,महाराष्ट्र, मुंबई.
१०. संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. कक्ष अधिकारी (विनिमय / व्यय-१५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प/विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती /अजाक.